दिनांक १० जुलै, २०१७ रोजी अमरनाथ यात्रेकरुवर झालेल्या दहशतवादी हल्ल्यामध्ये मृत झालेल्या २ व्यक्तींच्या वारसांना मदत देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आरएलएफ-२०१७ / प्र.क्र.२१९ / म-०३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ११ जुलै, २०१७

**वाचा :**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांकः आरएलएफ-११-०३/प्र.क्र.३१०/म-३, दिनांक २४ ऑगस्ट, २००४
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांकः आरएलएफ/१२-०८/प्र.क्र.२९८/म-३, दि.१ डिसेंबर, २००८

**प्रस्तावना :**

दिनांक १० जुलै, २०१७ रोजी अमरनाथ यात्रेसाठी गेलेल्या यात्रेकरुवर दहशतवादी हल्ला होवून सदर हल्ल्यामध्ये ०७ व्यक्ती ठार झाल्या आहेत. तसेच अनेक व्यक्ती जखमी झाल्या आहेत. जिल्हाधिकारी, पालघर यांनी दिलेल्या माहितीनुसार सदर मृतांमध्ये महाराष्ट्रातील पालघर जिल्ह्यातील १) श्रीमती उषा सोनकर, वय ५५ वर्षे, रा.डहाणू, जि.पालघर व २) श्रीमती निर्मला ठाकूर, वय ५५ वर्षे, रा.आशागड, जि.पालघर या २ व्यक्तींचा समावेश आहे. महसूल व वन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक २४ ऑगस्ट,२००४ व दिनांक १ डिसेंबर,२००८ रोजीच्या शासन निर्णयान्वये ठरविण्यात आलेल्या निकषानुसार विहीत केलेली आर्थिक मदत देणे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय:**

दिनांक १० जुलै, २०१७ रोजी अमरनाथ यात्रेसाठी गेलेल्या यात्रेकरुंवर दहशतवादी हल्ला होवून सदर हल्ल्यामध्ये ०७ व्यक्ती ठार झाल्या आहेत. तसेच अनेक व्यक्ती जखमी झाल्या आहेत. जिल्हाधिकारी, पालघर यांनी दिलेल्या माहितीनुसार सदर मृतांमध्ये महाराष्ट्रातील पालघर जिल्ह्यातील १) श्रीमती उषा सोनकर, वय ५५ वर्षे, रा.डहाणू, जि.पालघर व २) श्रीमती निर्मला ठाकूर, वय ५५ वर्षे, रा.आशागड, जि.पालघर या २ व्यक्तींचा समावेश आहे. सदर घटनेमध्ये मृत पावलेल्या खालील २ व्यक्तींच्या वारसांना वारसांना खालीलप्रमाणे मदत देण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | मृत पावलेल्या यात्रेकरुचे नांव | राज्य शासनामार्फत द्यावयाची मदत | मुख्यमंत्री सहायता निधी मार्फत द्यावयाची मदत | एकूण निधी |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती उषा सोनकर, वय ५५ वर्षे, रा.डहाणू, जि.पालघर | रुपये ५.०० लक्ष | रुपये ५.०० लक्ष | रुपये १०.०० लक्ष |
| २ | श्रीमती निर्मला ठाकूर, वय ५५ वर्षे, रा.आशागड, जि.पालघर | रुपये ५.०० लक्ष | रुपये ५.०० लक्ष | रुपये १०.०० लक्ष |

उपरोक्त विषयी योग्य त्या प्राधिकाऱ्याने मृत्यूचे कारण प्रमाणित करण्याच्या अधिन राहून मृत व्यक्तींच्या वारसांना मदत अनुज्ञेय राहील.

i) वरीलप्रमाणे राज्य शासनाकडून देण्यात येणाऱ्या मदतीसाठीचा खर्च खालील लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक सी-५
२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण,
६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम,
२०० इतर कार्यक्रम,
२००(०१) (०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य (२२३५ ०३४७),

ii) मुख्यमंत्री सहायता निधी कक्षाकडून देण्यात येणारा निधी मुख्यमंत्री सहायता निधीमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१११७१८३५५११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
Date: 2017.07.12 11:46:25 +05'30'

**( सुभाष उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव / सचिव (मुख्यमंत्री सहायता निधी कक्ष)
२. विभागीय आयुक्त कोकण विभाग, कोकण
३. जिल्हाधिकारी, पालघर
४. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
८. उप सचिव (कार्यासन म-११), मदत व पूनर्वसन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. अवर सचिव/कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प-६/व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (कार्यासन म-३)

**<u>प्रत माहितीसाठी अग्रेषित :-</u>**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मंत्री (मदत व पूनर्वसन ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. मा.राज्यमंत्री (मदत व पूनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मुंबई-४०० ०३२.
४. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. अपर मुख्य सचिव (मदत व पूनर्वसन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय यांचे स्वीय सहायक, विधानभवन, मुंबई.
७. सचिव व संचालक, आपत्ती व्यवस्थापन यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.